**अधीक्षक अभियंता, घाटघर (विद्युत व यांत्रिकी) मंडळ, कळवा-ठाणे हे मंडळ कार्यालय जळगांव येथे स्थलांतरीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आढावा-२०१६/५०७/प्र.क्र.१९९ /२०१६/आ.(प्रशि)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

तारीख: २९ मार्च, २०१७

**वाचा :-** १. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि.८.३.१९८४.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.१०९२/सीआर-८०६/व्यय-६, दि.१५.१०.१९९२.

३. शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.आढावा-१००४/२०२/०४/जवि, दि.१९.७.२००७.

४. शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.सीओई-१२१०/(१२७/२०१०)/जवि, दि.५.३.२०११.

५.शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.आढावा-२०१६/प्रक्र.१५१/२०१६/आ.(प्रशि.),दि.२१.१०.२०१६.

**प्रस्तावना -**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद व तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव या दोन महामंडळ कार्यालयाधिनस्त पूर्ण झालेल्या प्रकल्पांतर्गतची विद्युत तसेच उपसा सिंचन योजनेच्या व तद्नुषंगिक इतर कामांसाठी अ.क्र.४ व अ.क्र.५ येथील शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता (विद्युत) जलविद्युत प्रकल्प, मुंबई यांचे नियंत्रणाखाली कार्यरत ३ विभाग व अधिनस्त १० उपविभाग कार्यालये औरंगाबाद, जळगांव व धुळे मुख्यालयी स्थलांतरीत करण्यात आली आहेत.

या स्थलांतरीत केलेल्या विभाग उपविभाग कार्यालयांच्या प्रशासकीय व तांत्रिक नियंत्रणात समतोल राखण्यासाठी तसेच तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव अंतर्गत सद्य:स्थितीत पुर्ण झालेल्या प्रकल्पांवरील विद्युत कामांसाठी स्वतंत्र विद्युत मंडळ कार्यालयाची आवश्यकता असल्याने, मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई यांचे नियंत्रणाखाली अधीक्षक अभियंता, घाटघर (विद्युत व यांत्रिकी) मंडळ, कळवा-ठाणे हे मंडळ कार्यालय (ठाणे कार्यक्षेत्रातील २ पथके, १ विभाग व अंतर्गतची २ उपविभागीय कार्यालये वगळून) जळगांव मुख्यालयी स्थलांतरीत करण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

तापी पाटबंधारे विकास महामंडळ कार्यालयाच्या कार्यक्षेत्रातील पुर्ण झालेल्या विद्युत कामांसाठी मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अधिनस्त कार्यरत असलेले अधीक्षक अभियंता, घाटघर (विद्युत व यांत्रिकी) मंडळ, कळवा-ठाणे हे मंडळ कार्यालय जळगांव या ठिकाणी स्थलांतरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त प्रमाणे होणाऱ्या बदलास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

(अ) कळवा-ठाणे येथील अधीक्षक अभियंता, घाटघर (विद्युत व यांत्रिक) हे मंडळ कार्यालय अधीक्षक अभियंता, तापी-गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगांव या नावाने कार्यान्वित करण्यात यावे.

(आ) मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत, मुंबई यांचे नियंत्रणाखाली अधीक्षक अभियंता, तापी-गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगांव हे मंडळ व अंतर्गतची पथक, विभाग व उपविभागीय कार्यालये कार्यरत राहील.

(इ) प्रशासकीय व आस्थापना खर्चात वाढ होऊ नये म्हणून स्थलांतरीत मंडळ कार्यालय (अधीक्षक अभियंता, तापी-गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगांव) जळगांव येथील शासकीय इमारतीच्या जागेत कार्यान्वित करावे. जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

(ई) मंडळ कार्यालय, उर्वरित कार्यभार व आवश्यक त्या कार्यालयीन सर्व अभिलेखे (प्रारुप परिच्छेद, निरीक्षण अहवाल, निवृत्तीवेतन, न्यायालयीन व सेवाविषयक प्रकरणे मूळ सेवापुस्तकांसह इ. अभिलेख/ प्रकरणे यासह) जळगांव मुख्यालयी कार्यान्वित करण्याचे स्वयंस्पष्ट आदेश मुख्य अभियंता (विद्युत) जलविद्युत प्रकल्प, मुंबई यांनी द्यावेत.

(उ) घाटघर (विद्युत व यांत्रिकी) मंडळ, कळवा-ठाणे या कार्यालयातील मंजूर पदांवरील गट-अ व गट-ब मधील कार्यरत अधिकाऱ्यांची नियुक्ती स्थलांतरणाने कार्यान्वित होणाऱ्या ठिकाणी करण्यात यावी. तर गट-क व गट-ड मधील मंजूर पदांवरील आवश्यक कर्मचारी स्थानिक परिमंडळ कार्यालयांमार्फत उपलब्ध करुन घेण्यात यावेत.

(ऊ) स्थलांतरीत मंडळ कार्यालयाचे व अंतर्गतच्या विभाग व उपविभाग कार्यालयांचे प्रशासकीय व तांत्रिक नियंत्रण मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई यांचे अंतर्गतच राहील.

३. घाटघर (विवयां) मंडळ, कळवा-ठाणे हे मंडळ कार्यालय शासन आदेशानुसार मंजूरी दिल्याप्रमाणे दि.०२.०५.२०१७ पासून नियोजित ठिकाणी कार्यान्वित होईल यादृष्टीने मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, जलसंपदा विभाग, मुंबई यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही त्वरेने पूर्ण करावी.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक. ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/ एडीएम-९, दि.८ मार्च, १९८४ मधील तरतूदीनुसार अधीक्षक अभियंता, तापी-गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगांव या मंडळ कार्यालयाचे अधीक्षक अभियंता यांना “आहरण व संवितरण अधिकारी” व “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. अधीक्षक अभियंता, तापी-गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगांव या मंडळ कार्यालयाचे वेतन व वेतनेतर खर्च ४७०१-मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०४) योजनेतर-वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अशंदान, (०४) (०४) तापी पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अशंदान (४७०१ आय १९९) या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच सन २०१७-१८ व त्यापुढील नियमित वार्षिक तरतूद उपलब्ध करुन घेण्याबाबत आवश्यकती कार्यवाही तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव या कार्यालयाने विहित कालावधीत शासनाकडे करावी.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक १०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१५१५५४२०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.03.29 15:19:39 +05'30'

**( वि. का. चौधरी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४) मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव.
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६) मा.विधानसभा/विधान परिषद सदस्य (सर्व)
७) प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
११) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक.
१३) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१४) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) सर्व मुख्य अभियंता/ सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१६) मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई.
१७) अधीक्षक अभियंता, घाटघर (विद्युत व यांत्रिकी) मंडळ, कळवा-ठाणे.
१८) अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे. (कार्यालयांच्या मुख्यालय बदलाची आवश्यक नोंद घेण्यास्तव)
२०) सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.

**********

(शासन निर्णय क्रमांक आढावा-२०१६/५०७/प्र.क्र.१९९/आ.(प्रशि.),दिनांक २९ मार्च, २०१७ सोबतचे प्रपत्र-अ)

**अधीक्षक अभियंता, तापी-गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगांव या मंडळ कार्यालयांतर्गतची विभाग/ उपविभाग या कार्यालयांची कार्यालयीन रचना**

| कार्यालयांच्या नियंत्रणाखाली कार्यरत कार्यालये | | मुख्यालय |
|---|---|---|
| **विभाग** | **उपविभाग** | |
| जलविद्युत उपसा सिंचन संकल्पचित्र पथक क्र.१, ठाणे. | ---- | ठाणे |
| जलविद्युत उपसा सिंचन संकल्पचित्र पथक क्र.२, ठाणे. | --- | ठाणे |
| **तापी जलविद्युत व उपसा सिंचन विभाग क्र.२, धुळे.** | तापी जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.१, धुळे | **धुळे** |
| | तापी जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.२, नंदुरबार | **नंदुरबार** |
| | तापी जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.३,शहादा- नंदुरबार | **नंदुरबार** |
| घाटघर जलविद्युत विभाग क्र.३, ठाणे. | सूर्या जलविद्युत उपविभाग क्र.२, सूर्यानगर | पालघर |
| | घाटघर जलविद्युत विभाग क्र.३ब, माणगांव | माणगांव (जि.रायगड) |
| **तापी जलविद्युत व उपसा सिंचन विभाग, जळगांव.** | तापी जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.१, जळगांव | **जळगांव** |
| | तापी जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.२, जळगांव | **जळगांव** |
| | तापी जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग, मुक्ताईनगर-जळगांव | **जळगांव** |
| गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन विभाग, औरंगाबाद. | गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.१, संगमनेर | संगमनेर (जि.अहमदनगर) |
| | गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.२, नांदेड - वाघाळा | नांदेड |
| | गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.३, औरंगाबाद | औरंगाबाद |
| | गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.४, लातूर | लातूर |

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce263 68b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.03.29 15:21:29 +05'30'

**(वि. का. चौधरी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**